महाराष्ट्र शासन

**एसपीबी-२०२४/प्र.क्र.३८/सां.का.१**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग.**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १९ जून, २०२४.

**वाचा :** १) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, शासन निर्णय क्र. एसपीबी-२०२३/प्र.क्र.११४/सां.का.१, दि.२३.११.२०२३
२) सचिव, रंगभूमी प्रयोग परिनिरीक्षण मंडळ यांचे पत्र क्र.रंप्रपम/ संगणकीकरण/२००४/२०२४, दि.१५.०४.२०२४.

**ज्ञापन :**

सन २०२३-२४ या वित्तीय वर्षात रंगभूमी परिनिरीक्षण मंडळास माहे ०१ फेब्रुवारी, २०२३ ते २९ फेब्रुवारी, २०२४ या कालावधीत प्राप्त झालेल्या सुमारे १.५० लक्ष इतक्या पृष्ठांचे संगणकीकरण मे.ब्रेन्ट इंटरप्रायझेस कंपनीकडून पूर्ण करण्यात आले आहे. संदर्भ क्र. १ नुसार दस्ताऐवजांच्या संगणकीकरणासाठी रु.३.०० लक्ष इतक्या निधीस प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात आली आहे. त्यापैकी सन २०२३-२४ या वित्तीय वर्षातील सुधारित अर्थसंकल्पीय तरतूदीनुसार रु.२ लक्ष १० हजार इतका निधी उपलब्ध करण्यात आला होता. त्यानुसार कंपनीस रु.२ लक्ष १० हजार इतका निधी देण्यात आला होता. आता उर्वरित निधी रु.९०,०००/-(रुपये नव्वद हजार फक्त) माहे एप्रिल ते जुलै या कालावधीसाठी उपलब्ध करुन देण्यात आलेल्या निधीतून वितरित करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

**०२.** वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग पहिला उपविभाग तीन अ.क्र.४ नियम क्र.२७ (२) (अ) नुसार प्रशासकीय विभागास प्राप्त प्राधिकारानुसार सदर खर्चास मान्यता देण्यात येत आहे.

**०३.** यासाठी होणारा खर्च "मागणी क्रमांक झेडडी-२, २२०५ कला व संस्कृती, (००) १०४, पुराभिलेख, (०२) रंगभूमी प्रयोग परिनिरीक्षण मंडळ, (०२) (०१) मराठी नाटयसंहितांचे संगणकीकरण (२२०५ ३१५२), २० इतर प्रशासकीय खर्च या लेखाशिर्षाखाली सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाच्या उपलब्ध तरतुदीतून भागविण्यात यावा.

**०४.** यासाठी सचिव, रंगभूमी प्रयोग परिनिरीक्षण मंडळ, मुंबई यांना यासाठी नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून, त्यांनी प्राधिकृत केलेल्या दुय्यम अधिकाऱ्यास या संबंधित देयकावर स्वाक्षरी करण्यास प्राधिकृत करण्यात येत आहे.

**०५.** सदरचे ज्ञापन हे नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. २५७/का-१४४३, दि.१३.०५.२०२४ व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ४१०/२०२४/व्यय-१५,दि.१४.०६.२०२४ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

०६. सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध झाला असून, त्याचा सांकेतांक क्रमांक २०२४०६२०११२८०५४५२३ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ANIROODHA SURYAKANT DESHPANDE

Digitally signed by ANIROODHA SURYAKANT DESHPANDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT,
2.5.4.20=d34fa92fd12dd57b9647dbd172129b5c0eb8b1cd7ff442b98831311214458302, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=0D09B1312327B281B742D56CD04EE1899269D4FAAF88991AC3364BDCC437CF37, cn=ANIROODHA SURYAKANT DESHPANDE
Date: 2024.06.20 11:44:16 +05'30'

**(अ. सु. देशपांडे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. प्रधान सचिव, सांस्कृतिक कार्य यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
२. उप सचिव, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
३. सचिव, रंगभूमी प्रयोग परिनिरीक्षण मंडळ, मुंबई.
४. महालेखापाल, (लेखा अनुज्ञेयता)-एक, महाराष्ट्र, मुंबई.
५. महालेखापाल, (लेखा परिक्षा)-एक, महाराष्ट्र,मुंबई.
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
७. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
८. उप सचिव (अर्थसंकल्प), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई
(यांना उक्त अनुदानाची रक्कम अर्थसंकल्प वितरण प्रणालीव्दारे उपलब्ध करुन देण्यासंदर्भातील कार्यवाहीसाठी अग्रेषित)
९. निवडनस्ती (सां.का.१).